# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक-पोप्रमा-०६१७/प्र.क्र.३५८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २ ऑगस्ट २०१७.

**विषय** :- पोलीस ठाणे, चकलांबा, तालुका-गेवराई, जिल्हा-बीड, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यास नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक सीआरपी-०५०६/१०१५/ प्र.क्र.१५२/पोल-७, दिनांक २७.०७.२००७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ पो.स्टे.-चकलांबा-बीड-प्रई/ ७१/ २००६, दिनांक २३.०५.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस ठाणे, चकलांबा, तालुका-गेवराई, जिल्हा-बीड, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी, शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक सीआरपी-०५०६/१०१५/ प्र.क्र.१५२/ पोल-७, दिनांक २७.०७.२००७, व्दारे रु.३५,५०,०००/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. उक्त कामासाठी सन २०१२-१३ या वित्तीय वर्षात रु.३५,५०,०००/- इतका निधी उपलब्ध करण्यात आला होता.

२. तथापि, उक्त खर्चाचे अंदाज हे सन २००४-०५ च्या जिल्हा दरसूचीवर आधारित असल्याने उक्त निधी खर्च करण्यात आला नाही. आता, दरवाढ विचारात घेऊन, उक्त कामासाठी सन २०१५-१६ च्या जिल्हा दरसूचीनुसार रु.८४,४५,०००/- इतक्या खर्चाचे सुधारित अंदाज, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या संदर्भाधीन पत्राव्दारे सादर करण्यात आले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे सुधारित अंदाज हे उप-विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, गेवराई, यांनी तयार केले असून ते कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड व पोलीस अधीक्षक, बीड, यांनी साक्षांकित केले आहेत.

**४.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.१०५.२५ लक्ष** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे, पुढील अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

३) बांधकाम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ या अनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये.

**५.** त्या अनुसार, शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक सीआरपी-०५०६/१०१५/ प्र.क्र.१५२/पोल-७, दिनांक २७.०७.२००७, अधिक्रमित करुन, पोलीस ठाणे, चकलांबा, तालुका-गेवराई, जिल्हा-बीड, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यास, परिच्छेद ४ मध्ये नमूद केलेल्या अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**६.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**७.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५८३/इमा-२, दिनांक ११.०७.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**८.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०२१५२७५९१७२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.02 15:28:30 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद.
४) पोलीस अधीक्षक, बीड.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).